**पथदर्शक हवामान आधारीत पीक विमा योजना २०१०**
**विदर्भातील ६ जिल्ह्यात कपाशी पिकासाठी राबविण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक:हपिवियो-२०१०/प्र.क्र.११३/११-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ जून २०१०

वाचा:- १) कृषि व सहकार विभाग, केंद्र शासन यांचे पत्र क्र.१३०११/०१/२००८-Credit II, दि.३.३.२०१०
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.हपिवियो-२००९/प्र.क्र.२१०/११-अे, दि.१७.६.२००९
३) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र.MRO/८८५५/१०, दि.९.३.२०१०
४) शासन पत्र क्र.एनएआयएस-२०१०/प्र.क्र.१११/११-अे, दि.२०.५.२०१०
५) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र.MUMBAI RO/KHARIF २०१०/WBICS/२८५/२०१०, दि.३.६.२०१०
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.राकृवियो/सां.८/एसएलसीसी/१५४/२०१०, दि.३.६.२०१०
७) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.राकृवियो/सां.८/हपिवियो/१५७/२०१०, दि.७.६.२०१०

**शासन निर्णय :-**

खरीप हंगामामध्ये पर्जन्यमान या हवामान घटकाचा पीक परिस्थितीवर मोठया प्रमाणावर परिणाम होत असल्याने हवामान आधारीत पिक विमा योजना राज्यांत पथदर्शक स्वरुपात कपाशी पीकासाठी; बुलडाणा, अकोला, वाशिम अमरावती, यवतमाळ व वर्धा या ६ जिल्ह्यातील ६ तालुक्यामध्ये (referance unit area) सन २००८ पासून राबविण्यात आली. सन २०१०-११ मध्ये सदर योजनेची व्याप्ती वाढवून या जिल्हयांतील सर्व तालुक्यांचा समावेश करुन योजना राबविण्याचा निर्णय राज्यस्तरीय समन्वय समितीच्या बैठकीत घेण्यात आला. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपूरा पाऊस, पावसात पडणारा खंड व अती पाऊस या तीन धोक्यांपासून संरक्षण देणारी हवामान आधारीत पीक विमा योजना पथदर्शक स्वरुपात कपाशी पिकासाठी बुलडाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ व वर्धा या ६ जिल्ह्यातील सर्व ६४ तालुक्यांत (Taluka reference unit area) राबविण्यात येणार आहे.

**१) योजनेची उद्दिष्टे :-**

**अ)** पीक पेरल्यापासून पीक तयार होण्याच्या कालावधीत अपूरा पाऊस, पावसात पडणारा खंड व अतिपाऊस या पासून नुकसान झाल्यास योजनेच्या तरतूदीप्रमाणे शेतकऱ्यांना विमा संरक्षण आणि आर्थिक सहाय्य देणे

**ब)** पिकाचे नुकसानीच्या अत्यंत कठीण परिस्थतीतही शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य अबाधित राखणे .

**२) योजनेत समाविष्ट पिके व शेतकरी :-**

**अ)** हवामान आधारीत पिक विमा योजनेंतर्गत कपाशी पिकास विमा संरक्षण देय आहे.

**ब)** अधिसूचित क्षेत्रात अधिसूचित पीक म्हणजे कापूस पीक घेणारे सर्व शेतकरी या योजनेत भाग घेण्यास पात्र आहेत.

**(कृ.मा.प.)**

**क)** विविध वित्तीय संस्थांक्डे पिक कर्जासाठी अर्ज केलेल्या व ज्याची कपाशी पीक कर्ज मर्यादा मंजूर आहे अशा सर्व शेतकऱ्यांना योजना सक्तीची राहील.

**ड)** बिगर कर्जदार शेतकऱ्यांना योजना ऐच्छिक राहील.

**३) विमा संरक्षण मर्यादा :-**

प्रति हेक्टरी रु. १५,०००/-पर्यंत विमा संरक्षण देण्यात येणार आहे. विमा संरक्षित रक्कम पुढील प्रमाणे विभागण्यात आलेली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| अपूरा पाऊस | - | रु.५,५००/- | प्रति हेक्टरी |
| पावसातील खंड | - | रु.५,५००/- | प्रति हेक्टरी |
| अति पाऊस | - | रु.४,०००/- | प्रति हेक्टरी |

**४) समाविष्ट धोके व कालावधी :-**

**१. पावसाचे प्रमाण (कमी) -**

**१. अ. अपूरा पाऊस**

| | | | |
|---|---|---|---|
| अ) पहिला टप्पा | - | १६ जून, २०१० | ते १५ जुलै, २०१० |
| ब) दुसरा टप्पा | - | १६ जुलै, २०१० | ते १५ ऑगस्ट, २०१० |
| क) तिसरा टप्पा | - | १६ ऑगस्ट, २०१० | ते १५ सप्टेंबर, २०१० |
| ड) चौथा टप्पा | - | १६ सप्टेंबर, २०१० | ते ३१ ऑक्टोबर, २०१० |
| **१.ब. पावसातील खंड** | - | १ जुलै, २०१० | ते १५ सप्टेंबर, २०१० |

**२. अति पाऊस -**

| | | | |
|---|---|---|---|
| अ) पहिला टप्पा | - | १६ जून, २०१० | ते १५ जुलै, २०१० |
| ब) दुसरा टप्पा | - | १६ जुलै, २०१० | ते ३१ ऑगस्ट, २०१० |
| क) तिसरा टप्पा | - | १ सप्टेंबर, २०१० | ते ३१ ऑक्टोबर, २०१० |

**५) विमा हप्ता दर :-**

कपाशी पिकासाठी १२ टक्के विमा हप्ता दर निर्धारीत करण्यात आला आहे. प्रतिहेक्टरी रु.१८००/- अधिक सेवाकर १०.३० टक्के दराने रु. १८५.४० मिळून एकूण प्रति हेक्टरी विमा हप्ता रू. १९८५.४०/- ठेवण्यात आला आहे.

**६) विमा हप्ता अनुदान :-**

पथदर्शक हवामान आधारीत पीक विमा योजनेमध्ये भाग घेण्या-या सर्व शेतकऱ्यांना विमा हप्त्यापोटी ५० टक्के (केंद्र शासन २५ टक्के व राज्य शासन २५ टक्के) अनुदान देय आहे. पथदर्शक हवामान आधारीत पीक विमा योजनेतील सर्व अधिसुचित जिल्हे विदर्भ पॅकेज मधील जिल्हे असून विदर्भ पॅकेजद्वारे राष्ट्रीय पिक विमा योजनेमध्ये कपाशी पिकासाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना ७५ टक्के अनुदान (राज्य शासन ७० टक्के व कॅंद्र शासन ५ टक्के) व इतर शेतकऱ्यांना ५० टक्के अनुदान देय आहे. राज्य शासनाची ही अनुदान मर्यादा हवामान आधारीत पीक विमा योजनेमध्येही कायम ठेवण्यात येत असून केंद्राचे २५ टक्के अनुदान सर्व शेतकऱ्यांना देय असल्याने कपाशी पिकासाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना ९५ टक्के एकूण विमा हप्ता अनुदान देय राहील व इतर शेतक-यांना ७५ टक्के विमा हप्ता अनुदान देय राहील.

**अल्प-भूधारक** - २ हेक्टर (५ एकर) किंवा त्यापेक्षा कमी परंतु १ हेक्टरच्या वर धारण क्षेत्र असलेले शेतकरी

**अत्यल्प-भूधारक** - १ हेक्टर (२.५ एकर) किंवा त्यापेक्षा कमी धारण क्षेत्र असलेले शेतकरी

**७) प्रति हेक्टरी विमा हप्ता :-**

| शेतकरी प्रकार | प्रति हेक्टरी विमा हप्ता रुपये | सेवा करासह एकूण विमा हप्ता रुपये | शेतकऱ्याने भरावयाचा विमा हप्ता रुपये सेवाकरासहित | केंद्र शासनाचे अनुदान रुपये | राज्य शासनाचे अनुदान रुपये |
|---|---|---|---|---|---|
| अल्प व अत्यल्प भूधारक | १,८०० | १९८५.४० | **९९.२७** | ४९६.३५ | १,३८९.७८ |
| इतर शेतकरी | १,८०० | १९८५.४० | **४९६.३५** | ४९६.३५ | ९९२.७० |

**८) हंगामनिहाय वेळापत्रक :-**

| तपशिल | अंतिम तारीख | शेरा |
|---|---|---|
| विमा संरक्षण कालावधी | १६ जून, २०१० ते ३१ ऑक्टोबर, २०१० | -- |
| कर्जदार शेतकरी/कर्ज घेतलेले व बँकेकडून कापूस पीक कर्ज मर्यादा मंजूर असलेले शेतकरी यांचा विमा प्रस्ताव | १५ जुलै, २०१० | ज्या शेतकऱ्यांची कपाशी पिकासाठी बँकांकडून कर्जमर्यादा मंजूर असेल त्या सर्व शेतक-यांच्या क्षेत्राचा विमा प्रस्ताव विहित मुदतीत (१५ जुलै, २०१०) करुन घेणे बॅकांना अनिवार्य आहे. |
| बँकांनी कर्जदार शेतकऱ्यांची घोषणा पत्रे (डिक्लेरेशन) कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | १४ ऑगस्ट, २०१० | -- |
| बिगर कर्जदार शेतकऱ्यांनी विमा प्रस्ताव (प्रपोजल) बॅकांना सादर करण्याची मुदत | २५ जून, २०१० | ऐच्छिक सहभाग |
| बिगर कर्जदार शेतकऱ्यांची घोषणापत्रे (डिक्लेरेशन) बँकानी कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | १० जुलै, २०१० | -- |
| पर्जन्यमान आकडेवारी सादर करणे | दर आठवडयाला दैनंदिन पर्जन्यमान सादर करणे | नोंदणीकृत संस्थेमार्फत स्वंयंचलित हवामान केंद्र स्थापन करुन आकडेवारी कृषि विमा कंपनी घेईल. |
| नुकसान भरपाई अदा करणे | विमा कालावधी संपल्यापासून ४५ दिवस | विमा हप्ता अनुदान व पर्जन्यमान आकडेवारी वेळेत मिळण्याच्या अटीचे अधीन राहून कृषि विमा कंपनी अदा करेल. |

**९) बँक सेवा शुल्कः-**

कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांकडून जमा केलेल्या एकूण विमा हप्त्याच्या ५ टक्के रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीकडून बँक सेवा शुल्क म्हणून नोडल बँकाना देय आहे.

**१०) नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दतीः-**

अधिसुचित जिल्हयातील अधिसूचित तालुक्यातील मागील २५ वर्षाचे पर्जन्यमान लक्षात घेवून पिकाचे अवस्थेनुसार पर्जन्यमानाची प्रमाणके (ट्रिगर) निश्चित करण्यात आली आहेत. या प्रमाणकापेक्षा कमी/जास्त

**(कृ.मा.प.)**

पाऊस झाल्यास त्याप्रमाणात निर्धारीत दराने नुकसान भरपाई निश्चित करण्यात येईल. नुकसान भरपाईची रक्कम पूर्णपणे कृषि विमा कंपनी अदा करणार आहे.

अ) नुकसान भरपाई ठरविण्यासाठी कृषि विमा कंपनीने त्या त्या तालुक्यातील नोंदणीकृत संस्थेमार्फत स्थापित केलेल्या स्वयंचलित पर्जन्यमापन केंद्रात (संदर्भ पर्जन्यमापन केंद्र) नोंद झालेल्या आकडेवारीचा वापर केला जाईल.

ब) जर त्या तालुक्यातील संदर्भ पर्जन्यमापन केंद्रामार्फत काही कारणास्तव पर्जन्य आकडेवारी प्राप्त झाली नाही तर त्या कालावधीपूरती पर्यायी राज्य शासनाच्या पर्जन्यमापन केंद्राची आकडेवारी विचारात घेवून नुकसान भरपाई निश्चित करण्यात येईल.

क) संदर्भ पर्जन्यमापन केंद्र हे त्या तालुक्यातील कृषि विमा कंपनीने नोंदणीकृत संस्थेमार्फत स्थापित केलेले पर्जन्यमापन केंद्र राहील.

ड) संदर्भ पर्जन्यमापन केंद्रामार्फत प्राप्त पर्जन्य आकडेवारी ही ग्राह्य धरण्यात येवून त्यावर आधारीत योजनेच्या तरतुदी नुसार निश्चित करण्यात आलेली नुकसान भरपाई ही अंतिम राहील.

इ) नुकसान भरपाई ठरविण्याचा आराखडा मागील २५ वर्षाचे पर्जन्यमानाचा विचार करून निश्चित करण्यात आलेला आहे. यामध्ये ट्रिगर पर्जन्य प्रमाणके, त्यानुसार नुकसान भरपाईचा दर आणि पूर्णपणे नुकसान भरपाई देय असलेले ट्रिगर पर्जन्य प्रमाणके निश्चित करण्यात आलेले आहेत. ट्रिगर पर्जन्य प्रमाणके पिकाच्या वाढीच्या अवस्थेनुसार वेगवेगळी निश्चित करण्यात आलेली आहेत. (सोबत सहपत्र)

**११)** राष्ट्रीय कृषि विमा योजनेच्या तुलनेत हवामान आधारीत पिक विमा योजनेची उपयुक्तता तपासण्याच्या दृष्टीने अधिसुचित तालुक्यामध्ये राष्ट्रीय कृषि विमा योजनेतील नियोजनाप्रमाणे पीक कापणी प्रयोग घेण्यात यावेत.

**१२)** राष्ट्रीय कृषि विमा योजनेनुसार स्थापित राज्यस्तरीय समन्वय समिती, जिल्हास्तरीय तांत्रिक समीती तसेच निर्धारीत वित्तीयसंस्था, राज्यशासन, कृषि विमा कंपनी, कृषि आयुक्तालय यांची निर्धारीत कर्तव्ये व जबाबदाऱ्यांप्रमाणेच हवामान आधारित पीक विमा योजनेसाठीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या राहतील, तसेच पथदर्शक हवामान आधारित पिक विमा योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती (Operational Modalities) लागू राहिल.

**१३) हवामान आधारीत विमा योजना सन २०१०-११ च्या खरीप हंगामामध्ये** राबविण्यात येणार असून वरील सर्व सूचना लक्षात घेवून सर्व सबंधितांनी तात्काळ योजनेची अंमलबजावणी सुरु करावी व योग्य ती प्रचार, प्रसिध्दी करुन योजना प्रभावीपणे कार्यान्वीत होईल हे पहावे.

१४) योजनेत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांना द्यावयाचे अनुदानासाठी राज्य शासनाचे हिश्श्यापोटी येणारा खर्च पुढील लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पिय तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी- ३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११० - पीक विमा**
**११० - ( दोन) पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना**
**राज्य योजना (००) (०२) सर्वंकष पीक विमा योजना**
**(२४०१ ०९२२) ३३ अर्थसहाय्य**

१५)    या खर्चासाठी **सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१६)    सदर शासन निर्णय राष्ट्रीय कृषि विमा योजनेबाबतच्या राज्यस्तरीय पीकविमा समन्वय समितीने दि.३.५.२०१० रोजी दिलेल्या मंजूरीनुसार व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१७)    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००६१११८२२३८००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

सहपत्र : वरीलप्रमाणे

**( र. ब. पुरोहित )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (महसूल व वन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सहकार), सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ,कृषि मंत्रालय, भारत सरकार (कृषि व सहकार विभाग) कृषि भवन, नवी दिल्ली.(पत्राने)
सचिव, वित्त मंत्रालय भारत सरकार (वित्त विभाग) (विमा) नवी दिल्ली. (पत्राने)
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त (साखर), साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादीप बिल्डींग, कस्तुरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली,
प्रादेशिक व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, २० वा मजला स्टॉक एक्सचेज बिल्डींग, मुंबई -२३
विभागीय आयुक्त, अमरावती/नागपूर
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, शिवसागर इस्टेट, वरळी, मुंबई
महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी), मंत्रालय, मुंबई
संचालक (फलोत्पादन/मृद संधारण/कृषि प्रक्रिया व नियोजन/विस्तार व प्रशिक्षण) / मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
जिल्हाधिकारी, अमरावती/अकोला/वर्धा/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/अकोला/वर्धा/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ
व्यवस्थापक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंक, अमरावती/अकोला/वर्धा/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ
विभागीय कृषि सह संचालक, अमरावती/नागपूर
मुख्य अधिकारी (मध्यवर्ती वित्त संस्था), महाराष्ट्र राज्य सहकारी बॅंक , ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
मुख्य अधिकारी (ग्रामीण नियोजन व पत विभाग), रिझर्व्ह बॅंक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई
महाव्यवस्थापक, बॅंक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल, १५०१ , शिवाजीनगर, पुणे-५
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अमरावती/अकोला/वर्धा/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/अकोला/वर्धा/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ
उप सचिव (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती ११-अे.

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, क्र.हपिवियो-२०१०/प्र.क्र.११३/११-अे,दिनांकः ११ जून २०१० चे सहपत्र**
**पथदर्शी हवामानावर आधारित पीक विमा योजना (खरीप - २०१० )**

**पीक- कापूस**

सदर योजनेत अपूरा पाऊस, पावसातील खंड व अति पाऊस यामुळे कापूस उत्पादनात होणा-या विपरीत परिणामांपासून विमा संरक्षण देण्यात आले आहे, विमा कालावधीत संदर्भ हवामान केंद्रात मोजलेल्या पावसाचे ठरविलेल्या ट्रीगर (पावसाचे प्रमाण) पासून कमी किंवा जास्त विचलन झाल्यास, त्यामुळे होणा-या संभाव्य पिक नुकसानीस ठरविलेल्या दराने नुकसान भरपाई देण्यात येते.

**१. पावसाचे प्रमाण (कमी) :** या योजनेचा मुख्य उद्देश कापूस उत्पादक शेतक-यांना १६ जून ते ३१ ऑक्टोबर या कालावधीत अपु-या पावसामुळे होणा-या संभाव्य पिक (आर्थिक) नुकसान भरपाई करणे हा होय. या संरक्षणाचे २ प्रकार आहेत.

**१. अ. अपुरा पाऊस** : अपुरा पाऊस या संरक्षणाचे ४ टप्प्यात विभाजन केले आहे.

टप्पा (१) : १६ जून ते १५ जुलै

टप्पा (२) : १६ जुलै ते १५ ऑगस्ट

टप्पा (३) : १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर

टप्पा (४) : १६ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर हे टप्पे अनुक्रमे पेरणी , पीकवाढ , फूलधारणा व बोंड लागणे व बोंडे तयार होणे या अवस्थांशी जवळपास समांतर आहेत.

**टप्पा १ः १६ जून ते १५ जुलै** : या कालावधीत जर एकुण पाऊस १०० मी. मी. पेक्षा कमी व ४० मी.मी. पेक्षा जास्त असेल तर, कमी असलेल्या प्रत्येक मी. मी. ला शेतक-यांना रु. १०/- प्रती मी. मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु. ६००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकुण पाऊस ४० मी. मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मी.मी. पावसाला, शेतक-यांना रु. २२.५० प्रती मी.मी. प्रमाणे कमाल रु. ९००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. एकंदर या टप्प्यात एकुण रु. १५००/- इतकी कमाल आर्थिक नुकसान भरपाई देय आहे.

**टप्पा २ः १६ जुलै ते १५ ऑगस्टः** या कालावधीत जर एकुण पाऊस २०० मी. मी. पेक्षा कमी व ८० मी. मी. पेक्षा जास्त असेल, तर कमी असलेल्या प्रत्येक मी.मी. ला शेतक-यांना रु. ५/- प्रती मी. मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु. ६००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकुण पाऊस ८० मी. मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मी. मी. पावसाला शेतक-यांना रु. ११.२५ प्रती मी. मी. प्रमाणे कमाल रु. ९००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. एकंदर या टप्प्यात एकुण रु. १५००/- इतकी कमाल आर्थिक नुकसान भरपाई देय आहे.

**टप्पा ३ : १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर** : या कालावधीत जर एकूण पाऊस १३० मी. मी. पेक्षा कमी व ५० मी. मी. पेक्षा जास्त असेल, तर कमी असलेल्या प्रत्येक मी.मी. ला शेतक-यांना रु. ७/- प्रती मी. मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु. ५६०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस ५० मी. मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मी. मी. पावसाला शेतक-यांना रु. १८.८० प्रती मी. मी. प्रमाणे कमाल रु. ९४०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. एकंदर या टप्प्यात एकुण रु. १५००/- इतकी कमाल आर्थिक नुकसान भरपाई देय आहे.

**टप्पा ४ः १६ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबरः** या कालावधीत जर एकुण पाऊस ८० मी. मी. पेक्षा कमी व ३० मी. मी. पेक्षा जास्त असेल, तर कमी असलेल्या प्रत्येक मी.मी. ला शेतक-यांना रु.८/- प्रती मी. मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु. ४००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस ३० मी. मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मी. मी. पावसाला शेतक-यांना रु. २०/- प्रती मी. मी. प्रमाणे कमाल रु. ६००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. एकंदर या टप्प्यात एकूण रु. १०००/-इतकी कमाल आर्थिक नुकसान भरपाई देय आहे..

**टीप :** कुठल्याही टप्प्यात ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास तो पाऊस पुढील टप्प्यात मोजण्यासाठी पुढील प्रमाणे ग्राहय धरण्यात येईल. जर टप्पा एक मध्ये ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी २५ टक्के पाऊस टप्पा - २ मध्ये मोजण्यात येईल. जर टप्पा - २ मध्ये ट्रीगरच्या दुपटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी ३० टक्के पाऊस टप्पा - ३ मध्ये मोजण्यात येईल. टप्पा - ३ मध्ये ट्रीगरच्या दुपटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी ३० टक्के पाऊस टप्पा - ४ मध्ये मोजण्यात येईल.

| **अपूरा पाऊस** | **टप्पा १** | **टप्पा २** | **टप्पा ३** | **टप्पा ४** |
|---|---|---|---|---|
| **प्रमाणके** | १६ जून ते १५ जुलै | १६ जुलै ते १५ ऑगस्ट | १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर | १६ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर |
| ट्रीगर - १ (यापेक्षा कमी) मी.मी. | १०० | २०० | १३० | ८० |
| ट्रीगर - २ (यापेक्षा कमी) मी.मी. | ४० | ८० | ५० | ३० |
| कमाल नुकसान भरपाई योग्य पाऊस (मी.मी.) | ० | ० | ० | ० |
| भरपाई दर - १ (रु / मी.मी.) | १० | ५ | ७ | ८ |
| भरपाई दर - २ (रु / मी.मी.) | २२.५० | ११.२५ | १८.८० | २० |
| कमाल नुकसान भरपाई (रु. / हे.) | १,५०० | १,५०० | १,५०० | १,००० |
| एकूण नुकसान भरपाई (रु. / हे) | ५,५०० | | | |

**१. ब. पावसातील खंड :** १ जुलै ते १५ सप्टेंबर या कालावधीत सलग कोरडया दिवसांतून होणा-या पिक नुकसानीस विमा संरक्षण मिळते. पाऊस वितरण कालावधीत कुठल्याही सलग २ दिवशी एकूण ५ मी.मी.पेक्षा कमी पाऊस पडल्यास कोरडा दिवस म्हणून गणन्यात येईल. जर सलग कोरडे दिवस १५ ते २२ असतील तर रु.५००/- असे सलग कोरडे दिवस २३ ते २९ असतील तर रु.१५००/-, असे सलग कोरडे दिवस ३० किंवा ३० पेक्षा जास्त असतील तर रु.५५००/- नुकसान भरपाई मिळेल.

| **पावसातील खंड (लागोपाठ कोरडे दिवस)** | **१ जुलै ते १५ सप्टेंबर** | | |
|---|---|---|---|
| **प्रमाणके /ट्रीगर दिवस** | १५ ते २२ | २३ ते २९ | ३० किंवा त्यापेक्षा जास्त |
| कमाल नुकसान भरपाई (रु./हे.) | ५०० | १५०० | ५५०० |
| एकूण नुकसान भरपाई (रु./हे.) | ५५०० | | |

**२. अति पाऊस :** अति पाऊस विमा संरक्षणाचे ३ टप्यात विभाजन केले आहे.
टप्पा १ : १६ जून ते १५ जुलै
टप्पा २ : १६ जुलै ते ३१ ऑगस्ट
टप्पा ३: १ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर

**टप्पा १ : १६ जून ते १५ जुलै** या कालावधीत कोणत्याही दिवशी जेवढा पाऊस ६५ मी.मी.पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल. या कालावधीत अशा प्रत्येक दिवसाच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल. आणि नुकसान भरपाई ही रु.७.४१ प्रती मी.मी.प्रमाणे देण्यात येईल. जर एकूण अतिरिक्त पाऊस (बेरीज) २०० मी.मी.किंवा २०० मी.मी.पेक्षा जास्त असेल तर नुकसान भरपाई रु.१०००/- मिळेल.

**टप्पा २ : १६ जुलै ते ३१ ऑगस्ट** या कालावधीत कोणत्याही दिवशी जेवढा पाऊस १२५ मी.मी.पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल. या कालावधीत अशा प्रत्येक दिवसाच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल. आणि नुकसान भरपाई ही रु.८/-प्रती मी.मी.प्रमाणे देण्यात येईल. जर एकूण अतिरिक्त पाऊस (बेरीज) २५० मी.मी.किंवा २५० मी.मी.पेक्षा जास्त असेल तर कमाल नुकसान भरपाई रु.१०००/-मिळेल.

**टप्पा ३ : १ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर** या कालावधीत कोणत्याही दिवशी जेवढा पाऊस ६५ मी.मी.पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल.या कालावधीत अशा प्रत्येक दिवसाच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल. आणि नुकसान भरपाई ही रु. १८.१८ प्रती मी.मी. प्रमाणे देण्यात येईल. जर एकूण अतिरिक्त पाऊस (बेरीज) १७५ मी.मी. किंवा १७५ मी.मी. पेक्षा जास्त असेल तर नुकसान भरपाई रु. २०००/- मिळेल.

| **अती पाऊस** | **टप्पा - १** | **टप्पा - २** | **टप्पा - ३** |
|---|---|---|---|
| **प्रमाणके** | **१६ जून ते १५ जुलै** | **१६ जुलै ते ३१ ऑगस्ट** | **१ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर** |
| दैनंदिन पाऊस ट्रीगर (मी.मी.) (यापेक्षा जास्त) | ६५ | १२५ | ६५ |
| कमाल नुकसान भरपाई योग्य पाऊस (मी.मी.) | २०० | २५० | १७५ |
| भरपाई दर (रु./हे.) | ७.४१ | ८ | १८.१८ |
| कमाल नुकसान भरपाई (रु./हे.) | १००० | १००० | २००० |
| एकूण नुकसान भरपाई (रु./हे.) | ४००० | | |

**एकूण विमा संरक्षित रक्कम आणि विमा हप्ता - प्रति हेक्टर**

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम प्रति हेक्टर (रु.) | १५,०००/- |
| अल्प अत्यल्प भुधारक शेतक-यांनी भरावयाचा विमा हप्ता (सेवा करासह) (रु.) | ९९.२७ |
| इतर शेतक-यानी भरावयाचा विमा हप्ता, (सेवा करासह) (रु.) | ४९६.३५ |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी : अनिवार्य सहभाग -** बँकाकडून कापूस पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणा-या सर्व शेतक-यांचा विमा त्या त्या बँकाकडून आपोआप केला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी : ऐच्छिक सहभाग -** सदर शेतक-यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्ता त्याचे खाते असणा-या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करणे आवश्यक राहील.